श्री संतोष भंगवतराव मालोकार व इतर ५ यांना मा. न्यायालयाच्या आदेशानुसार न्या. कालेलकर करारानुसार पुर्वलक्षी प्रभावाने रुपांतरीत नियमीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः काव्याआ-६६१९/प्र.क्र.२४/आस्था-१०**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : -१६ ऑक्टोबर, २०२०

वाचा :- १) शासन निर्णय क्रंमाक सार्वजनिक बांधकाम क्रं. रुअआ-१५९६/२२८/सेवा-५ दि. २४ एप्रिल,२००१
२) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती यांचे पत्र क्रं.विकास/तांत्रिक आस्था/कावि/२३६ /२०१८ दिनांक २४ डिसेंबर,२०१८
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद अमरावती यांचे पत्र क्रं.जिप/बांध/सिआटीई आस्था/५६३१/२०१९ दिनांक १४ ऑक्टोबर,२०१९

**प्रस्तावना** :--

रोजंदारी आस्थापनेवरील कर्मचा-यांना न्या. कालेलकर करारानुसार पुर्वलक्षी प्रभावाने रुपांतरीत नियमीत अस्थायी आस्थपनेवर घेण्यासंदर्भात सार्वजनिक बांधकाम विभागाने धोरणात्मक निर्णय घेतला असुन, जे कर्मचारी सार्वजनिक बांधकाम विभाग दिनांक २४.०४.२००१ च्या शासन निर्णयामधील अटीची पुर्तता करतील त्यांना न्या.कालेलकर करारानुसार फायदे देण्यासाठी रुपांतरीत नियमीत अस्थायी आस्थापनेवर घेण्यास पात्र ठरविले आहे. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दि.२४.०४.२००१ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. १मधील अट क्र.१ नुसार रोजदांरी /कार्यव्ययी आस्थापनेवरील जे कर्मचारी शासन सेवेत /जिल्हा परिषद सेवेत कार्यरत आहेत आणि त्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासुन त्यांच्या सलग सेवेस उशिरात उशिर दिनांक ३१.१२.१९९८ रोजी ५ वर्षे व प्रत्येक वर्षी कामाचे २४० दिवस पुर्ण झालेली आहे आणि करारातील अटी पुर्तता करतील अशा कर्मचाऱ्यांना पुर्वलक्षी प्रभावाने रुपांतरीत नियमीत अस्थायी आस्थापनेवर घेण्यास पात्र ठरविले आहे. तसेच अट क्रमांक २ नुसार रोजंदारी कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांना त्यांच्या सेवेची आवश्यकता नसल्यामुळे शासकीय सेवेतुन कमी करण्यांत आलेले होते. तथापि, ज्या कर्मचाऱ्यांनी अशा कपातीविरुध्द न्यायालयात दावे दाखल केलेले आहेत अशा कर्मचाऱ्यांपैकी ज्यांना

न्यायालयाच्या निर्णयानुसार पुन:स्थापित करण्यात आलेले आहे अशा कर्मचाऱ्यांना पुर्वलक्षी प्रभावाने रुपांतरीत नियमीत अस्थायी आस्थापनेवर घेण्यास पात्र ठरविलेले आहे. याचबरोबर परिच्छेद क्रं.२ नुसार ज्या कर्मचाऱ्यांनी न्यायालयात दावे /रिव्हिजन /अपील /अवमान याचीका दाखल केलेली आहे अशा सर्व कर्मचाऱ्यांनी सर्व प्रकारचे दावे विनाअट मागे घेतल्यानंतर त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबतची कार्यवाही करण्यात येईल.

न्या. कालेलकर करार मागणी -१ रोजंदारी आस्थापना परिच्छेद -२८ मध्ये नियमीत आस्थापनेवर नेमणुक मिळण्याबाबत खालील तरतुद आहे.

" रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर कामगार नेमला गेला की , त्याला मुंबई मुलकी सेवा नियम लागु होतात."

श्री.रमेश लिबासराव वानखडे यांना मुख्य कार्यकारी अधिकारी ,जि.प. अमरावती यांनी दिनांक १९.०३.२०१४ च्या आदेशाअन्वये रोजंदारी अंतर्गत मैलकुली या पदावर सामावुन घेण्यात आलेले आहे तसेच श्री. दिलीप नथ्थुजी पोजगे यांना मुख्य कार्यकारी अधिकारी ,जि.प. अमरावती यांनी दिनांक १५.०३.२०१९ च्या आदेशाअन्वये रोजंदारी अंतर्गत चौकीदार या पदावर सामावुन घेण्यात आलेले आहे. मुख्य कार्यकारी अधिकारी , जि.प. अमरावती यांचे पत्र दि.१९.१२.२०१९ अन्वये श्री सुरेंद्र मनोहरराव माळवी व श्री. सुधीर श्रीकुष्ण माहोरे यांनी मा.कामगार न्यायालय, अमरावती Criminal Ulp No.२६/२०१९ च्या अनुषंगाने अवमान याचिका दाखल केलेली अाहे. न्यायालयीन निर्णयाचा अवमान होणार नाही याबाबतची दखल घेता, संबधित कर्मचारी हे रुपांतरीत नियमीत आस्थापनेवर घेण्यासाठी पात्र ठरतात.

अ.क्र.१ ते ६ मधील कर्मचारी यांनी नियुक्तीच्या दिनांकापासुन त्यांच्या सलग सेवा दिनांक ३१.१२.१९९८ रोजी ५ वर्षे पुर्ण झालेली असल्याने शासनाच्या निर्णयाच्या अटीची पुर्तता केलेली आहे. वि. औद्यगीक न्यायालय, अमरावती ULP No.४२५ /२०१८ च्या अनुषंगाने दिनांक ०५.०९.२०१२ ला पारीत झालेला वि उच्च न्यायालय, नागपुर रिट पीटीशन क्रंमाक ११३६ /२०१८ च्या अनुषंगाने दिनांक ०६.१२.२०१८ ला अंतीम निर्णयामध्ये दिनांक ०५.०९.२०१२ वि. कामगार न्यायालयाचा निर्णय कायम ठेवण्यात आल्याने श्री.दिलीपी नथ्थुजी पोजगे हे रुपांतरीत नियमीत आस्थापनेवर दिनांक ९.१०.१९८९ पासुन पुन:नियुक्ती देवुन दिनांक ०९.१०.८९ ते ०५.०९.२०१२ पर्यत ५० टक्के थकबाकी देण्याबाबतचे न्यायालयाने आदेश पारीत केलेले आहे. तसेच श्री. संतोष मालोकार व श्री दिनेश खंडारे यांना कामगार न्यायालय, अमरावती येथील तक्रार क्रं. ULP No.१५ /२०१५ मध्ये झालेल्या निर्णयानुसार रुपांतरीत नियमित आस्थापनेवर घेण्याबाबतचे आदेश देण्यात आलेले आहे. त्यानुसार खालील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय</u> :--**

रोजंदारी /कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचा-यांना रुपांतरीत नियमीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रं. रुअआ-१५९६/२२८/सेवा -५ दिनांक २४.०४.२००१ मधील तरतुदी विचारात घेवुन सोबत जोडलेल्या परिशिष्ट-"अ" मध्ये नमुद केल्याप्रमाणे विभागीय आयुक्त, अमरावती यांचे प्रस्तावातील श्री.संतोष मालेकार, श्री दिनेश खंडारे , श्री सुरेंद्र माळवी , श्री. सुधिर माहोरे , श्री रमेश वानखडे व श्री दिलीप पोजगे यांना रुपांतरीत नियमीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत शासनाने निर्णय घेतला आहे. या निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट-"अ" मधील रोजंदारी कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या रकाना क्रमांक ६ मधील पदावर व रकाना क्रं. ७ मध्ये दर्शविलेल्या दिनांकापासुन रुपांतरीत नियमीत अस्थायी आस्थापनेवर घेण्यास शासन मान्यता देत आहे.

२. शासनाच्या या निर्णयानुसार कर्मचा-यांना रुपांतरीत नियमीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यानंतर त्यांना न्या. कालेलकर कराराच्या तरतुदीनुसार अनुज्ञेय ठरणाऱ्या वेतनवाढीतील फरकाचे विनियमन पुढील प्रमाणे करण्यात येईल.

परिशिष्ट-"अ" मध्ये नमुद कर्मचाऱ्यांना रुपांतरीत नियमीत अस्थायी आस्थापनेवर नियुक्ती झाल्याच्या दिनांकापासुन दिनांक ३१.१२.२०१९ पर्यतच्या वेतन वाढीतील फरकाची रक्कम (सर्व प्रकारच्या भत्तासहीत ) सन २०१९-२० या आर्थिक वर्षापासुन त्या त्या वर्षाच्या ऑक्टोबर महिन्यात संबधित कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधी (त्यांच्या सेवानिवृत्तीला शिल्लक कालावधी विचारात घेवुन जास्तीत जास्त दहा (१०) समान हप्तात जमा करण्यात यावी ) व प्रत्येक हप्ता त्यांच्या भविष्य निर्वाह निधी जमा झाल्यापासुन ३ वर्षापर्यंत सदर रक्कम त्यांना खात्यातुन काढता येणार नाही. दिनांक ०१.०१.२०२० पासुन पुढील वेतन वाढीतील फरकाची रक्कम सर्व प्रकारच्या भत्त्यांसहीत संबधित कर्मचाऱ्यांच्या नांवे काढलेल्या धनादेशाव्दारे अदा करण्यात यावी.

उपरोक्त कर्मचारी जर सेवानिवृत्त झालेले असतील अश्या कर्मचाऱ्यांना रुपांतरीत नियमीत अस्थायी आस्थापनेवर नियुक्ती झाल्याच्या दिनांकापासुन सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यतच्या वेतन वाढीतील फरकाची रक्कम (सर्व प्रकारच्या भत्तासहीत ) त्यांना अनुज्ञेय होणारी थकबाकीची संपुर्ण रक्कम ही त्यांच्या नांवे काढलेल्या धनादेशाव्दारे अदा करण्यात यावी.

३.वर नमुद केलेल्या थकबाकीच्या रक्कमेवर कोणत्याही प्रकारचे व्याज अनुज्ञेय असणार नाही आणि संबधित कर्मचाऱ्याकडुन अथवा दिवगंत कर्मचाऱ्याच्या वारसाकडुन भविष्यात व्याजाबाबतची मागणी करण्यांत येणार नाही. अशा प्रकारचे प्रतिज्ञापत्र त्यांनी जिल्हा परिषदेला सादर करणे बंधनकारक राहील.

४. संबधित जिल्हा परिषदेने या शासन निर्णयान्वये कर्मचाऱ्याला चालु आर्थिक वर्षात अदा करावा लागणारा खर्च मंजुर अनुदानातुन करावयाचा आहे.

५. रुपांतरीत नियमीत अस्थायी आस्थपानेवर आदेश निर्गमित झाल्यानंतर सदर आदेश उपरोक्त कर्मचाऱ्यांना मान्य नसल्यास त्यांनी त्याबदलचे लेखी प्रतिवेदन त्याला व्यक्ती निहाय आदेश मिळाल्यापासुन तीन महिन्यांत सादर करणे आवश्यक आहे. या मुदतीत कोणतेही प्रतिवेदन प्राप्त न झाल्यास त्यांचे काढलेले आदेश अंतीम समजण्यात येतील. व त्यांनतर त्यांची कोणतीही तक्रार विचारात घेतली जाणार नाही.

६. अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत झालेले पद संबधित पदधारक ज्या दिनांकापर्यत सेवेत असतील त्या दिनांकापर्यत चालु ठेवण्यात येत आहे त्यांनतर सदरची पदे व्यपगत होतील.

७. हे आदेश शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रं. रुअआ-१५९६/२२८/सेवा -५ दिनांक २४.४.२००१ अन्वये दिलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२०१०१४१४५११५९०२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shashank Yashwant Barve

Digitally signed by Shashank Yashwant Barve
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4f19736b62993d2c7e716a76cdcfdaa8a6a08fc2f15bfd41fed42ec7306bf1e8, cn=Shashank Yashwant Barve
Date: 2020.10.16 14:23:37 +05'30'

**(श.य.बर्वे)**
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा.राज्यपाल यांचे सचिव.

२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.मंत्री (ग्रा.वि) यांचे खाजगी सचिव.
४) मा.राज्यमंत्री (ग्रा.वि) यांचे खाजगी सचिव
५) मा.विधानसभा /मा.विधान परिषद सदस्य (सर्व)
६) मा.अध्यक्ष, जिल्हा परिषद अमरावती.
७) मा.अतिरिक्त मुख्य सचिव (ग्राम विकास व पंचायत राज).
८) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.
९) उप सचिव/सह सचिव (सर्व),ग्राम विकास विभाग, मुंबई.
१०) उप आयुक्त (आस्थापना) कोकण विभाग, बेलापूर, नवी मुंबई.
११) मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद अमरावती, अमरावती.
१२) निवड नस्ती, कार्यासन आस्था-१०, ग्राम विकास विभाग,मंत्रालय ,मुंबई.

परिशिष्ट-"अ"

शासन निर्णय ग्रामविकास विभाग क्रंमाक : काव्यआ-६६१९/प्र.क्र.२४/आस्था-१०
दिनांक १६/१०/ २०२० चे सहपत्र

| अ.क्र | कर्मचा-याचे नांव | आस्थपनेचा प्रकार | नेमणुकीचे पद | विभागाचे नांव | रुपांतरीत अस्थायी आस्थपनेवर घ्यावयाच्या पदाचे नावं | रुपांतरीत अस्थायी आस्थपनेवर घेण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | संतोष भंगवतराव मालोकार | रोजंदारी | परिचर | जि.प. अमरावती | परिचर | १८.०६.१९९७ |
| २ | श्री दिनेश किसनराव खंडारे | रोजंदारी | बागवान | जि.प. अमरावती | बागवान | ०५.०१.१९९८ |
| ३ | श्री सुरेद्रं मनोहरराव माळवी | रोजंदारी | परिचर | जि.प. अमरावती | परिचर | ३०.०८.१९९७ |
| ४ | श्री सुधीर श्रीकुष्ण माहोरे | रोजंदारी | अनुरेखक (कुशल कामगार) | जि.प. अमरावती | अनुरेखक (कुशल कामगार) | २७.०७.१९९८ |
| ५ | श्री रमेश लिबासराव वानखडे | रोजंदारी | मैलकुली | जि.प. अमरावती | मैलकुली | ०१.१२.१९९६ |
| ६ | श्री दिलीप नथ्थुजी पोजगे | रोजंदारी | चौकीदार | जि.प. अमरावती | चौकीदार | ०९.१०.१९८९ |

Shashank Yashwant Barve

Digitally signed by Shashank Yashwant Barve
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4f19736b62993d2c7e716a76cdcfdaa8a6a08fc2f15bfd41fed42ec7306bf1e8, cn=Shashank Yashwant Barve
Date: 2020.10.16 14:24:23 +05'30'

( श.य. बर्वे )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन